स्व.खाशाबा जाधव चषक राज्यस्तर कुस्ती स्पर्धा आयोजनासाठी निधी वितरित करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: क्रीस्पर्धा-३२२४/प्र.क्र.०४/क्रीयुसे-२,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
दिनांक : ०७ मार्च, २०२४.

वाचा :-

१. शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र.क्रीस्पर्धा-२०११/प्र.क्र.४५/क्रीयुसे-२, दि.०३ जानेवारी, २०१२
२. शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र.क्रीस्पर्धा-११२१/प्र.क्र.३१/क्रीयुसे-२, दि.१५ फ़ेब्रुवारी, २०२३
३. सहसंचालक, क्रीडा व युवक सेवा यांचे पत्र क्र.क्रीयुसे/स्व.खा.जा.कु/स्पर्धा/२०२३-२४/का-४/५६४९,दि. २७.०२.२०२४
४. शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र.पुनर्वि-२८२३/प्र.क्र.१०२/अर्थसंकल्प, दि.०७.०३.२०२४

**प्रस्तावना :-**

राज्याचे क्रीडा धोरण, २०१२ मधील मुद्दा क्र. ५.४ नुसार शासन निर्णय दि.१५ फ़ेब्रुवारी, २०२३ अन्वये खेळाडूंना सकस आहार, निवास व्यवस्था, प्रेक्षक गॅलरी, प्रवास खर्च, पारितोषीके, आयोजनावरील खर्च पाहता स्व.खाशाबा जाधव चषक राज्यस्तर कुस्ती स्पर्धेच्या आयोजनासाठी प्रतिवर्ष देण्यात येणा-या अनुदानामध्ये रु.७५.०० लक्ष एवढी वाढ करण्यास मान्यता देण्यात आली आहे. सदर क्रीडा धोरण हे नियोजन विभाग, वित्त विभागाच्या तसेच मंत्रीमंडळाच्या मान्यतेने निश्चित करण्यात आले आहे.

त्यानुसार दि.०७ ते ११ मार्च, २०२४ या कालावधीत तालुका क्रीडा संकुल उदगीर, जि.लातुर येथे आयोजित करण्यात येणा-या स्व.खाशाबा जाधव चषक राज्यस्तर कुस्ती स्पर्धा आयोजनासाठी निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सन २०२३-२४ या आर्थिक वर्षामध्ये स्व.खाशाबा जाधव चषक राज्यस्तर चषक राज्यस्तर कुस्ती स्पर्धेचे आयोजन करण्याकरीता रु.४,००,३५,०००/-(अक्षरी- रुपये चार कोटी पत्तीस हजार फक्त) इतका निधी वितरित करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. या संदर्भात होणारा खर्च "२२०४-क्रीडा व युवकसेवा-१०४-क्रीडा व खेळ- (२६)-कुस्ती स्पर्धा (२६)(०१)- स्व.खाशाबा जाधव राष्ट्रीय कुस्ती स्पर्धा (कार्यक्रम) ३१-सहाय्यक अनुदाने वेतनेत्तर (२२०४-२०३७)" या लेखाशिर्षाखाली सन २०२३-२४ मधील मंजूर तरतूदीमधून भागविण्यात यावा. सदर अनुदान ज्या प्रयोजनासाठी मंजूर करण्यात आले आहे, त्याच प्रयोजनासाठी खर्च करण्यात यावे. उपरोक्त निधी आवश्यकतेनुसार मान्य निकषानुसार खर्च करण्यात यावा. ज्यावेळेस निधी प्रत्यक्ष खर्च करावयाचा त्याच वेळी आहरीत करावा. शासन लेख्याबाहेर बँक खात्यात हा निधी ठेवू नये.

I. राज्य शासनामार्फत वेळोवेळी वित्त विषयक निर्गमित करण्यात आलेले विविध आदेश/नियम/शासन निर्णय वित्तीय नियमावली यांची अंमलबजावणी करुन वरील वितरीत तरतूदीचा विनियोग करण्याच्या अधीन राहून उपरोक्त तरतूद वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

३. सदर योजनेअंतर्गत खेळाडूंना मानधन मंजूर करतांना संदर्भ क्र. १ च्या शासन निर्णयामधील अटी व शर्ती लागू राहतील.

४. शासनाच्या सूचनांनुसार उपरोक्त तरतुद खर्च करण्याबाबतची कार्यवाही करण्यात यावी. यासाठी संबंधीत जिल्हा क्रीडा अधिकारी, लातुर यांना आहरण व संवितरण अधिकारी व आयुक्त, क्रीडा व युवक सेवा यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय नियोजन विगाभाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.१३४/१४७१, दि.०४/०३/२०२४ अन्वये तसेच वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.३५६/व्यय-५,दि.०६/०३/२०२४ अन्वये प्राप्त सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३०७१८५६४११२२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SUNIL SURYAKANT HANJE

Digitally signed by SUNIL SURYAKANT HANJE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT, 2.5.4.20=b52de42797ba0b88d4615daa9566ad8fa49d50637950208576d69ab9dba313a9, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=345A2816550FE595955B31526C8E1A31863F6F9DC898D91E4543436BE8B73FDA, cn=SUNIL SURYAKANT HANJE
Date: 2024.03.07 19:07:10 +05'30'

**( सुनिल हंजे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल,महाराष्ट्र राज्य.
२. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव.
३. मा. उपमुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव.
४. मा. अध्यक्ष/उपाध्यक्ष, विधानसभा, विधानभवन , मुंबई
५. मा. सभापती/उपसभापती, विधानपरिषद, विधानभवन , मुंबई
६. मा.मंत्री, क्रीडा व युवक कल्याण विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
७. मा.विरोधी पक्षनेता (विधानसभा/विधानपरिषद) यांचे स्वीय सहायक, मुंबई.
८. सर्व विधानसभा/विधानपरिषद सदस्य यांचे स्वीय सहायक.
९. अपर मुख्य सचिव, (क्रीडा), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
१०.प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
११.आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे,
१२. महालेखापाल (लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ - मुंबई/महाराष्ट्र-२ नागपूर,
१३. महालेखापाल (लेखा), महाराष्ट्र-१ - मुंबई/महाराष्ट्र-२ नागपूर
१४. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई(क्रीडा संचालनालयामार्फत) .

१५.सर्व जिल्हा कोषागार अधिकारी (क्रीडा संचालनालयामार्फत )
१६.वरिष्ठ कोषागार अधिकारी, पुणे(क्रीडा संचालनालयामार्फत) .
१७.लेखाधिकारी, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे, (क्रीडा संचालनालयामार्फत)
१८. उपसंचालक व जिल्हा क्रीडा अधिकारी, लातुर (क्रीडा संचालनालयामार्फत),
१९.वित्त विभाग व्यय ५ /अर्थ -८, नियोजन विभाग (का. १४७१ ) मंत्रालय मुंबई,
२०. अवर सचिव, अर्थसंकल्प, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई,
२१.निवड नस्ती (क्रीयुसे-२).